**खरीप हंगामापूर्वी शेतकऱ्यांना आवश्यक बाबींच्या खरेदीसाठी व पायाभूत सुविधांच्या उभारणीसाठी अर्थसहाय्याच्या योजनांची अंमलबजावणी प्रतिवर्षी माहे एप्रिलपासून सुरु करण्याबाबतचे स्थायी आदेश.**

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२२/प्र.क्र.४०/२-अे,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२,

दिनांक :- ०८ एप्रिल, २०२२

**प्रस्तावना:-**

कृषि विभागामार्फत विविध केंद्र व राज्य पुरस्कृत योजनांची तसेच, बाहय सहाय्यित प्रकल्पांची अमंलबजावणी करण्यात येते. केंद्र पुरस्कृत योजनांचे वार्षिक कृती आराखडे अंतिम झाल्यानंतर शासनास वर्षभरात एक किंवा दोन टप्प्यात निधी प्राप्त होतो त्याचप्रमाणे, राज्य पुरस्कृत योजनांसाठी देखील टप्प्या-टप्प्याने निधी प्राप्त होतो. कृषि विभागास निधी टप्प्या-टप्प्याने प्राप्त होत असला तरी कृषि क्षेत्राचे कामकाज हे हंगाम निहाय चालते तसेच, खरीप व रब्बी हंगामात लागवडी खाली येणाऱ्या क्षेत्रापैकी सुमारे ७५ % क्षेत्रावर खरीप हंगामातच विविध पिकांची लागवड होते. त्यामुळे खरीप हंगाम हा राज्याच्या अर्थव्यवस्थेच्या आणि शेतकऱ्यांच्या दृष्टीने अत्यंत महत्वाचा आहे. सबब, या हंगामातील पिकांना पूरक ठरणाऱ्या विविध योजनांतर्गत बाबींची खरीप हंगाम पूर्व व हंगाम कालावधीतच अंमलबजावणी करणे शेतकऱ्यांना सहाय्यभूत ठरणार आहे.

कृषि विभागाच्या योजना व प्रकल्पांच्या माध्यमातून राज्यातील शेतकरी बांधवांना शेतीसाठी आवश्यक असलेल्या विविध बाबींच्या खरेदीसाठी तसेच, शेतावर विविध पायाभूत सुविधांच्या उभारणीसाठी अर्थसहाय्य करण्यात येते. यामध्ये प्रामुख्याने बियाणे, यंत्र व औजारे, ठिबक / तुषार संच इ.ची खरेदी तसेच, शेततळे खोदकाम, शेततळयास प्लास्टिक अस्तरीकरण, कांदाचाळ, शेडनेट गृह व हरितगृह उभारणी, फळबाग लागवड नियोजन इ. बाबींचा समावेश आहे. सदरची कामे प्रामुख्याने पावसाळ्यापूर्वीच करण्याकडे शेतकऱ्यांचा कल असतो.

या पार्श्वभूमीवर, खरीप हंगामापूर्वी शेतकऱ्यांना आपल्या शेताकरिता आवश्यक बाबींच्या खरेदीसाठी व शेतावरील पायाभूत सुविधांच्या उभारणीसाठी कृषि विभागाच्या विविध योजनांच्या माध्यमातून वेळीच अर्थसहाय्य करता यावे म्हणून दर वर्षी माहे एप्रिल महिन्यातच शेतकऱ्यांचे अर्ज मागवून लाभार्थ्यांची निवड करुन त्यांना मंजूरी देण्याची कार्यवाही तातडीने करणे आवश्यक आहे. याकरिता पुढीलप्रमाणे शासन निर्णयाद्वारे स्थायी आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.

**शासन निर्णय :-**

१. कृषि विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या सर्व केंद्र व राज्य पुरस्कृत योजना तसेच जागतिक बँक सहाय्यित प्रकल्पांसाठी अर्थसंकल्पीय अंदाज पुस्तकामध्ये प्रति वर्षी मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतुदीच्या किमान ८० टक्के निधी उपलब्ध होईल असे गृहित धरुन सर्व योजना व प्रकल्पांतर्गत लाभार्थ्यांची निवड करण्याकरिता प्रत्येक वर्षी एप्रिल महिन्याच्या पहिल्या आठवड्यात जाहिरात प्रसिध्द करावी व इच्छुक शेतकऱ्यांकडून महाडीबीटी प्रणालीव्दारे अर्ज मागवून लाभार्थी निवडीची प्रक्रिया तातडीने सुरु करावी.

२. कृषि आयुक्तालयाने अर्थसंकल्पीय तरतूदीच्या ८० टक्के निधीच्या मर्यादेत जिल्हा व तालुका निहाय अस्थायी स्वरुपात आर्थिक लक्षांक निश्चित करुन द्यावेत आणि केंद्र व राज्य पुरस्कृत पुरस्कृत योजनांचे वार्षिक कृती आराखडे अंतिम झाल्यानंतर सुधारीत जिल्हा व तालुका निहाय आर्थिक लक्षांक क्षेत्रीय स्तरावर कळवावेत.

३. महाडीबीटी पोर्टलवर शेतकऱ्यांकडून प्राप्त होणाऱ्या अर्जांतून सोडत पध्दतीने तालुका निहाय लाभार्थ्यांची तातडीने निवड करण्यात यावी. योजनेतंर्गत संबंधीत जिल्ह्यास/तालुक्यास निधी वितरणाची/ सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीवर प्रत्यक्ष निधी उपलब्ध होण्याची वाट न पहाता लाभार्थ्यांना तातडीने पूर्वसंमती आदेश निर्गमित करुन निधी प्राप्त झाल्यानंतर महाडीबीटी प्रणालीव्दारे लाभार्थ्यांच्या आधार संलग्न बँक खात्यामधे निधी जमा करण्याची कार्यवाही करण्यात यावी.

४. मागील काही वर्षांत शेतकऱ्यांच्या अर्जांना पूर्वसंमती दिल्यानंतर योजना अंमलबजावणी पूर्ण करण्याच्या प्रक्रियेत शेतकऱ्यांच्या गळतीचे प्रमाण लक्षात घेता, प्रत्येक योजनेकरीता जिल्हा/तालुका निहाय प्राप्त होणाऱ्या एकूण आर्थिक लक्षांकांच्या किती पट सोडत काढण्यात यावी याचा निर्णय सर्व कृषि संचालकांनी आयुक्त (कृषि) यांच्या मान्यतेने घ्यावा.

५. या शासन निर्णयान्वये देण्यात येत असलेले सदर आदेश स्थायी स्वरुपाचे असून या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या प्रक्रियेची आयुक्त (कृषि) यांनी प्रत्येक वर्षी अंमलबजावणी करावी.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून त्याचा संकेतांक क्र. २०२२०४१११३००५१२३०१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SHRIKANT C ANDGE

Digitally signed by SHRIKANT C ANDGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPT., postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, pseudonym=1CC019CBB7F0A77E397F15793DF809A69806ED98, serialNumber=D8D9626C9E038380CD235C048F20D7CE74CFFD3A95F2AC3C192E9C991F358271, cn=SHRIKANT C ANDGE
Date: 2022.04.11 15:57:17 +05'30'

**( श्रीकांत आंडगे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति:**

१. मा. मुख्य मंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२

२. मा.उप मुख्य मंत्री (वित्त व नियोजन), महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२
३. मा. मंत्री (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
४. मा. राज्य मंत्री (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
५. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२
६. अ.मु.स.(वित्त) वित्त विभाग, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२
७. अ.मु.स.(नियोजन) नियोजन विभाग, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२
८. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०.प्रकल्प संचालक, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प, मुंबई
११.प्रकल्प संचालक, मा. बाळासाहेब ठाकरे कृषि व्यवसाय व ग्रामीण परिवर्तन प्रकल्प, पुणे
१२.व्यवस्थापकीय संचालक (महाबीज), अकोला
१३.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई.
१४.सर्व सह सचिव / उप सचिव, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१५.कृषि संचालक (सर्व), कृषि आयुक्तालय, पुणे.
१६.विभागीय कृषि सह संचालक (सर्व).
१७.सर्व अवर सचिव / कार्यासन अधिकारी, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१८. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व).
१९. संग्रहार्थ निवडनस्ती (२अे).